कोविड-१९ उपाययोजनांतर्गत औषधी व सर्जिकल बाबींची खरेदी मे. हाफकिन महामंडळाकडून करण्यास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

## शासन निर्णय क्रमांकः कोविड-२०२०/प्र.क्र. २६८/प्रशासन-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

तारीख: ०९ मार्च २०२२

**वाचा :-**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६

२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. २४०/उद्योग-४, दिनांक २६.०७.२०१७.

३) शासन निर्णय क्रमांक. कोविड-२०२०/प्र.क्र.२६८/प्रशा-२, दिनांक २०.११.२०२०

४) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/औषधी खरेदी/सुप्रमा/कोविड-१९/औखक/१२८६९/२०२१, दि. २३.०९.२०२१.

५) व्यवस्थापकीय संचालक, मे. हाफकिन महामंडळ यांचे पत्र क्र.जा.क्र.१२२१९/हाफकिन/खरेदी कक्ष/कोविड-१९/प्रशासकीय मान्यता/२०२१-२२, दिनांक २६.११.२०२१.

**प्रस्तावना :-**

कोविड-१९ उपाययोजनांतर्गत शासकीय वैद्यकीय / आयुर्वेद महाविद्यालय व संलग्नित रूग्णालयांसाठी लागणाऱ्या "परिशिष्ट-अ" मध्ये नमुद एकूण ६६ अत्यावश्यक औषधी व सर्जिकल साहित्य, रसायणे व उपकरणे इत्यादी बाबींची खरेदी मे. हाफकिन महामंडळाकडून करण्यासाठी शासनाच्या संदर्भ क्र. ३ वरील दिनांक २०.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये रु. १०७.४७ कोटी इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तसेच सदर खरेदी प्रक्रिया ही उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमुद विहित कार्यपध्दतीचे पालन करुन करण्याबाबत सूचित करण्यात आले होते. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र. ४.४.३.१ मधील तरतूदीनुसार ०९ बाबींचे दर हे प्रशासकीय मान्यतेच्या दरापेक्षा १० टक्क्याहून जास्त आल्याने, सदर बाबींच्या वाढीव दरास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

कोविड-१९ उपाययोजनांतर्गत अत्यावश्यक औषधांची खरेदी मे. हाफकिन महामंडळाकडून करण्यास शासनाच्या संदर्भ क्र. ३ वरील दिनांक २०.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यासोबतच्या “परिशिष्ट-अ” मध्ये नमुद एकूण ६६ अत्यावश्यक औषधी व सर्जिकल साहित्य, रसायणे व उपकरणे इत्यादी बाबींपैकी ०९ बाबींचे दर हे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक ०१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील मुद्दा क्र. ४.४.३.१ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय मान्यतेच्या दरापेक्षा १० टक्क्याहून जास्त आले असल्याने, उक्त ०९ अत्यावश्यक औषधी व सर्जिकल साहित्य, रसायणे व उपकरणे इत्यादी बाबींच्या खालील तक्त्यात नमुद केल्याप्रमाणे वाढीव दरास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | शासनाच्या संदर्भ क्र.३ वरील दि. २०.११.२०२० च्या शासन निर्णया सोबतच्या परिशिष्ट अ मध्ये नमुद क्रमांक | नाव | यापुर्वी मान्यता दिलेले प्रशासकीय दर (रुपये) | वाढीव/ सुधारित दर (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | १२ | Sterile Gloves size 6.5 | १७ | २३.७२ |
| २ | १३ | Sterile Gloves size 7 | १७ | २३.७२ |
| ३ | १४ | Sterile Gloves size 7.5 | १७ | २३.७२ |
| ४ | २९ | Disposable Syringe 20 ml | ३.५४ | ४.१० |
| ५ | ४१ | Dial flow | १५ | ३४.२३ |
| ६ | ४४ | Inj. Ceftriaxone 1 gm | ११.७७ | १३.३१ |
| ७ | ४७ | Inj. Insulin Plain 40 IU | ५६.६४ | ९४.४८ |
| ८ | ४८ | Inj. Roccuronium | १४१ | २१३.४१ |
| ९ | ४९ | Inj. Attracurrium | २४.१९ | ३७.४६ |

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दि. १७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक ७ अनुसार विभागास असलेल्या अधिकारान्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०९१५२४४९७४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2022.03.09 18:50:15 +05'30'

(म. गि. जोगदंड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई.
३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन महामंडळ, मुंबई.
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
६. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
९. सर्व अधिष्ठाता / अधीक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय
१०. निवडनस्ती (प्रशासन -२)